**राज्यातील शासकीय व महानगरपालिका वैद्यकीय महाविद्यालयातील बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) या अभ्यासक्रमाच्या आंतरवासिता विद्यार्थ्यांना विद्यावेतन मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: एमईडी-१०२१/प्र.क्र.३६/२१/शिक्षण-२**

गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते.रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१.
दिनांक: १९/०५/२०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक अंतर्गत बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) हा अभ्यासक्रम एकूण ३ वर्षांचा असून त्यानंतर १ वर्ष आंतरवासिता कालावधी पूर्ण करणे आवश्यक असते. या आरोग्य विज्ञान पदवी अभ्यासक्रमाच्या आंतरवासिता विद्यार्थ्यांना विद्यावेतन मंजूर करण्यासाठी विविध लोकप्रतिनिधींकडून तसेच विद्यार्थ्यांकडून वारंवार मागणी होत आहे. तसेच विद्यावेतन लागू करण्यासाठी मा.मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे रिट याचिका (WP ७९५२/२०१८) दाखल झाली होती. सदर याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक २४/०४/२०१९ रोजीच्या आदेशान्वये शासनाने निर्णय घेणेबाबत निदेश दिले आहेत. बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) अभ्यासक्रमांचे विद्यार्थी आंतरवासिता कालावधीमध्ये रुग्णालयांमध्ये वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या मदतीसाठी/रुग्णसेवेसाठी अपघात विभाग, रेडिऑलॉजी विभाग, बाह्य रुग्ण विभाग, प्रयोगशाळा विभाग, कार्डिओलॉजी विभाग, न्यूरॉलॉजी विभाग तसेच त्यांच्या विषयांप्रमाणे त्या-त्या विभागामध्ये त्यांच्या सेवा देत असतात. त्यामुळे रुग्णसेवेमध्ये त्याचा मोठा फायदा होतो व रुग्णसेवा तातडीने होण्यासाठी प्रत्यक्षरीत्या मदतच होते. तसेच वाढती रुग्णसंख्या विचारात घेता सदर विद्यार्थ्यांच्या अधिकाधिक सेवा रुग्णहितार्थ वापरण्याची आवश्यकता भासत आहे.

राज्यातील शासकीय व महानगरपालिका वैद्यकीय महाविद्यालयातील बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) या अभ्यासक्रमाच्या आंतरवासिता विद्यार्थ्यांना विद्यावेतन मंजूर करणेबाबतच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९/०४/२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त पार्श्वभूमीवर बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) या अभ्यासक्रमाच्या आंतरवासिता विद्यार्थ्यांना विद्यावेतन मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शासकीय व महानगरपालिका वैद्यकीय महाविद्यालयातील बी.एस्सी. (पॅरामेडिकल टेक्नॉलॉजी) या अभ्यासक्रमाच्या आंतरवासिता विद्यार्थ्यांना दरमाह रु.८,०००/- (रुपये आठ हजार फक्त) इतके विद्यावेतन अदा करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उक्त विद्यावेतन हे माहे मार्च, २०२३ पासून लागू राहील.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च हा संबंधित शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाच्या "३४-शिष्यवृत्ती व विद्यावेतन" या उद्दिष्टाखाली संबंधित लेखाशिर्षांर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच, महानगरपालिकेंतर्गत वैद्यकीय महाविद्यालयांमधील विद्यार्थ्यांचे विद्यावेतन हे संबंधित महापालिकेच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावे.

४. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.१०० अ/व्यय-१३, दि.२२/०२/२०२३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने आणि मंत्रिमंडळाच्या दिनांक १९/०४/२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०५१९१७२५०८७०१३ असा आहे. हा निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.05.19 17:49:07 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१३. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१४. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व सह सचिव/उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१८. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई
१९. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
२०. संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
२१. सर्व अधिष्ठाता, शासकीय / महानगरपालिका वैद्यकीय महाविद्यालये (संचालनालयामार्फत)
२२. निवडनस्ती (शिक्षण-२)